**निवडणूक आयोगास प्रायोगिक तत्वावर वापरण्याकरिता V.V.P.A.T (Voter Verified Paper Audit Trail ) यंत्राच्या खरेदी, पूरवणी मागणी अग्रिम मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -बीयुडी २०१७/१६१/प्र.क्र.५७/का-३७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०८ सप्टेंबर, २०१७

**प्रस्तावना :**

लोकसभा व विधानसभेच्या धर्तीवर स्थानिक स्वराज्य संस्थाच्या निवडणुका निर्भय, मुक्त व पारदर्शक तसेच प्रलोभनमुक्त वातावरणात व्हाव्यात, याकरिता प्रत्येक राज्यामध्ये राज्य निवडणूक आयोगाची स्थापना करण्यात आलेली आहे. राज्यामध्ये स्थानिक स्वराज्य संस्थाच्या (महानगरपालिका, नगर परिषदा,नगर पंचायती, जिल्हा परिषदा,पंचायत समित्या, ग्रामपंचायती) निवडणुका दर ५ वर्षानी घेऊन लोकप्रतिनिधी निवडले जातात. फेब्रुवारी २०१७ मध्ये झालेल्या महानगरपालिकेच्या निवडणूकीनंतर काही व्यक्तींनी तसेच राजकीय पक्षांनी इलेक्ट्रॉनिक मतदान यंत्राच्या कार्यप्रणालीबाबत संशय व्यक्त केला असून न्यायालयात याचिका दाखल करण्यात आल्या आहेत. अशा प्रकारच्या तक्रारी मागील काही वर्षामध्ये झालेल्या निवडणूकांबाबत सतत येत असल्याने मा.सर्वोच्च न्यायालयाने डॉ.सुब्रमण्यम स्वामी विरुद्ध भारत निवडणूक आयोग (सिव्हील अपील क्रमांक - ९०९३/२०१३) या याचिकेमध्ये दिनांक ८ ऑक्टोबर, २०१३ रोजी लोकसभा व विधानसभा निवडणुकांसाठी टप्प्या-टप्प्याने V.V.P.A.T (Voter Verified Paper Audit Trail ) वापरण्याचे आदेश दिले आहेत. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र राज्यामध्ये प्रथमच प्रायोगिक तत्वावर व्हि.व्हि.पि.ए.टी. V.V.P.A.T (Voter Verified Paper Audit Trail) यंत्राचा वापर होणार असल्याने यावेळी व्हि.व्हि.पि.ए.टी यंत्राच्या खरेदीकरिता आवश्यक असणारा निधी राज्य शासन उपलब्ध करुन देणार आहे. तसेच यानंतर नियमित वापर होणार असल्यास त्याकरिता होणारा खर्च संबधित महानगर पालिकेकडून करण्यात येणार आहे. यास्तव सदर प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करण्याचा विचार शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

स्वराज्य संस्थाच्या निवडणुकांबाबत जनसामांन्याच्या मनातील संशय दूर करण्याकरिता तसेच मतदारांना पारदर्शकपणे, भयमुक्त मतदान करण्याकरिता राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांनी ऑक्टोबर, २०१७ मध्ये नांदेड महानगर पालिकेच्या होणाऱ्या सार्वत्रिक निवडणूकांकरिता प्रायोगिक तत्वावर सुमारे ३५० व्हि.व्हि.पि.ए.टी.(V.V.P.A.T.) (Voter Verified Paper Audit Trail) यंत्राचा वापर करण्याचे योजिले आहे.

२. मेसर्स इलेक्ट्रॉनिक कॉर्पोरेशन ऑफ इंडिया यांचेकडून सुमारे ३०० मशीन (प्रती मशीन २३,२१२/- व प्रत्येक निवडणुकीकरिता प्रती मशीन रु.३०००/- आवर्ती खर्च असे एकूण रु.२६,२१२/- प्रती मशीन खर्च) खरेदीकरता येणाऱ्या रु. ९२.०० (रुपये ब्यॅण्णव लाख फक्त) इतक्या खर्चास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च मागणी क्रमांक ए-४, लेखाशिर्ष २०७० इतर प्रशासनिक सेवा, ८०० - इतर खर्च (००) (०८) राज्य निवडणूक आयोग, (अनिवार्य) (२०७० ०६४८) (२१-सामुग्री व पुरवठा याखाली) खर्ची टाकण्यात यावा. या प्रयोजनासाठी उपलब्ध करुन दिलेले पूरक अनुदान याच प्रयोजनासाठी वापरण्यात यावे. अन्यथा शासनास विहित कालावधीत समर्पित करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३५/२०१७/व्यय -४, दि.१९.६.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनंतर निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०८१३२४१२३१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

Suresh Rajendrarao Kalasker

Digitally signed by Suresh Rajendrarao Kalasker
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2cc5d502d2808166f14439713ecfd22090ad056c72dd4986514fabb71611cd2a, cn=Suresh Rajendrarao Kalasker
Date: 2017.09.08 13:16:15 +05'30'

**(सुरेश कळसकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति**

१) मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य,मुंबई
२) मा.आयुक्त,राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य,मुंबई

३) सचिव,राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य,मुंबई

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई

५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई

६) लेखाधिकारी,भारतीय रिझर्व्ह बँक, फोर्ट,मुंबई

७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई

८) सहसंचालक लेखा व कोषागारे संचालनालय,संगणक कक्ष,नविन प्रशासन भवन,५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई-३२

९) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

१०) वित्त विभाग/विनियम,व्यय-४ अर्थसंकल्प -१३/१९/कोषागार प्र-५

११) नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

१२) ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई

१३) सामान्य प्रशासन विभाग,कार्यासन-२५

१४) निवडनस्ती